अल्पसंख्याक संशोधन व प्रशिक्षण संस्था (MRTI) स्थापन" करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-६५२४/प्र.क्र.१८/का.१,**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - २२ ऑगस्ट, २०२४

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक समाजाची शैक्षणिक, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक उन्नती होण्यासाठी राज्यातील बार्टी, सारथी, महाज्योती या स्वायत्त संस्थांच्या धर्तीवर संस्था स्थापन करणेबाबत राज्यातील अल्पसंख्याक समुदायांकडून मागणी होत आहे. राज्यामध्ये मुस्लिम, जैन, बौद्ध, ख्रिश्चन, ज्यू, सिख व पारशी हे धार्मिक अल्पसंख्याक समुदाय आहेत.

२. राज्यातील अल्पसंख्याक समुदायांच्या, सामाजिक, शैक्षणिक आणि आर्थिक विकासाशी संबंधित समस्यांचा अभ्यास करणे आणि शासनास त्यावरील उपाययोजना सुचवून त्या अनुषंगाने आवश्यकतेनुसार प्रशिक्षण देणे, याकरिता बार्टी, सारथी, महाज्योती या सारख्या संस्थांच्या धर्तीवर अल्पसंख्याक समुदायासाठी या विभागाच्या अधिपत्याखाली **"अल्पसंख्याक संशोधन व प्रशिक्षण संस्था (MRTI)** स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णयः-**

अल्पसंख्याक विकास विभागाच्या अधिपत्याखाली **"अल्पसंख्याक संशोधन व प्रशिक्षण संस्था (MRTI)"** स्थापन करून सदर कार्यालयासाठी **११ पदे निर्माण करण्यास** मान्यता देण्यात येत आहे.

२. अल्पसंख्याक संशोधन व प्रशिक्षण संस्थेचे कार्यालय **छत्रपती संभाजी नगर** येथे राहील.

३. **अल्पसंख्याक संशोधन व प्रशिक्षण संस्था** ( MRTI) हे केंद्र स्थापन होण्याकरिता सध्यस्थितीत **संचालक** हे पद **वगळून** उर्वरित वरील **१० पदांना उच्चस्तरीय सचिव समितीची** मान्यता घेण्यात येईल तसेच संचालक पदाला कार्योत्तर मान्यता घेण्यात येईल.

४. नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या "अल्पसंख्याक संशोधन व प्रशिक्षण संस्थेच्या" आस्थापनेवरील पदांचे वेतन, कार्यालयीन खर्च, मागासलेपणाचा अभ्यास करण्यासाठी व प्रशिक्षणासाठी रु. ६.२५ कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. उपरोक्त संस्थेच्या आवर्ती व अनावर्ती खर्चासाठी नवीन लेखाशिर्ष निर्माण करण्याची कार्यवाही विभागामार्फत स्वतंत्रपणे करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२४०८२२१२४७१२४११४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RICHA BAGLA

Digitally signed by RICHA BAGLA
DN: c=IN, o=DEPARTMENT OF ATOMIC ENERGY, ou=JOINT SECRETARY FINANCE, 2.5.4.20=a3109555f6e797794da3044e462c1e2bcaa4744c4aed5902bc76175dbd07dfab, postalCode=400001, st=MAHARASHTRA, serialNumber=c2c1da75707252047a01ab2fe3e7858f7f0297f3cb54b98daf23e897c437e927, cn=RICHA BAGLA
Date: 2024.08.22 13:03:39 +05'30'

**( डॉ. रिचा बागला )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. अध्यक्ष/ मा. सभापती, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
५. मा. मंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, विधान भवन, मुंबई.
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य /विधानसभा सदस्य,
९. मा. मुख्य सचिव
१०. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय मुंबई.
११.सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१५. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
१७. संचालक, संचालनालय लेखा व कोषागारे, कुटीर क्र.१५ व १६, बॅरेक्स , मंत्रालय समोर, मुंबई
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.
२१. निवडनस्ती/संग्रहार्थ (कार्यासन-१)